“मत्स्यव्यवसाय निगडित समस्या/अडचणी वर उपाययोजना सुचविण्यासाठी तांत्रीक व पुनर्विलोकन समिती गठित करण्यासंदर्भात”

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मत्स्यवि- ११२२/प्र.क्र.९८/पदुम-१४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १३ मे, २०२२

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याला विशाल जलचर संसाधनाची (vast aquatic resources) देणगी आहे. ज्यामध्ये सागरी, निमखारे पाणी, भुजल संसाधनाचा समावेश आहे. राज्याला ७२० कि.मी लांबीचा किनारपट्टी लाभलेली असुन ४५६ मच्छिमारी गावे आहेत व १७३ मासळी उतरविणारी केंद्रे आहेत.भुजल संसाधने उदा.नद्या, तलाव, जलाशय, टाक्या, शेततळे, इत्यादी आहेत. राज्यामध्ये भूजलाशयीन मत्स्यव्यवसायासाठी फार मोठा वाव असून या क्षेत्रात ग्रामीण भागामध्ये रोजगार निर्मिती होण्याची क्षमता आहे. मासे हे प्रथिने, खनिजे आणि जीवनसत्त्वे समृध्द असल्याने अन्नाचे महत्त्वाचे स्रोत आहेत. तरी, राज्यात प्रथिने उपलब्धता व्हावी, मत्स्य दरडोई उत्पन्न वाढविणे यासाठी मत्स्योत्पादन वाढविण्यास राज्य शासन सतत प्रयत्नशील आहे.

मत्स्यव्यवसाय हे अनेक मच्छिमारांसाठी उत्पन्नाचे आणि रोजगाराचे साधन म्हणून काम करते. म्हणुन राज्य शासनामार्फत मत्स्यव्यवसाय क्षेत्राला (सागरी, निमखारे पाणी, भुजल) विकसित करण्याच्या दृष्टिने विविध योजना राबविल्या जातात जसे नविन निर्माण झालेल्या तलावामध्ये मत्स्यबीज संचयन करणे, पिंजरा पध्दतीने मत्स्यसंवर्धन करणे, मत्स्यखाद्य निर्मिती कारखाना, मत्स्यबोटूकली संवर्धन, तळी बांधणे, बर्फ कारखाना, मासेमारी नौका यांत्रीकीकरण इत्यादी. परंतु मत्स्यव्यवसाय क्षेत्रात काही वेळा हवामानात बदल, नैसर्गिक संसाधनांचा अतिशोषण, समुद्र/खाडी क्षेत्रात बांधण्यात येणारे बांधकाम, मासेमारी पध्दती, अवकाळी होणारे वादळ इत्यादी बाबीमुळे पर्यावरण व मत्स्यव्यवसायावर विपरीत परिणाम होतात व त्यामुळे बरेचसे आव्हाने निर्माण होतात. जसे की, मत्स्यउत्पादन कमी होणे, मच्छिमारांचे उदरनिर्वाहाचे प्रश्न निर्माण होणे इत्यादी बाबी.

मत्स्यव्यवसाय क्षेत्रात येणारी नवीन आव्हाने, निर्माण होणा-या अडिअडचणी/समस्या, मत्स्यउपादन वाढविणे, मच्छिमारांना उदर निर्वाहाचे साधन प्राप्त होणे, मत्स्यव्यवसायाशी संबंधित विविध मुद्दे इत्यादी बाबीवर तांत्रिक पध्द्तीने उपाययोजना करुन समस्याचे निवारण करण्याकरीता तांत्रिक समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. तसेच सदर समितीमार्फत प्राप्त होणा-या अहवालावर निर्णय घेण्यासाठी पुर्नविलोकन समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

मत्स्यव्यवसाय क्षेत्राशी निगडित उद्वभवणा-या समस्या/ अडिअडचणी यावर उपाययोजना सुचविण्यासाठी क्षेत्रीय स्तरावर आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्या अध्यक्षतेखाली तांत्रीक समिती गठित

करणे व सदर समितीमार्फत प्राप्त होणा-या अहवालावर योग्य निर्णय घेण्यासाठी शासनस्तारावर पुनर्विलोकन समिती गठित करण्याबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे.

आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्या अध्यक्षतेखाली तांत्रिक समिती-

| **अ.क्र.** | **सदस्यांचे नाव** | **समितीचे पदनाम** |
|---|---|---|
| १ | आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र ,मत्स्योद्योग विकास महामंडळ | सदस्य |
| ३ | सहाय्यक संचालक वित्त, आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, मुंबई | सदस्य |
| ४ | उपनिबंधक, आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, मुंबई | सदस्य |
| ५ | प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग, मुंबई /पुणे/अमरावती/ नाशिक/लातुर/औरंगाबाद/नागपुर, | सदस्य |
| ६ | राष्ट्रिय समुद्री विज्ञान संस्था (NIO), अंधेरी, मुंबई यांचे प्रतिनिधी, | सदस्य |
| ७ | केंद्रिय सागरी मत्स्य संशोधन संस्था ( CMFRI ), मुंबई केंद्र यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ८ | केंद्रिय मत्स्यकी शिक्षण संस्था (CIFE), मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | केंद्रिय गोडेपाणी जीवपालन अनुसंधान संस्था, (CIFA), भुवनेश्वर यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १० | केंद्रिय मत्स्यकी प्रोद्योगिकी संस्था (CIFT), मुंबई यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ११ | भारतीय मत्स्यकी सर्वेक्षण ( FSI ) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १२ | सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ कोस्टल इंजिनिअरिंग फॉर फिशरी (CICEF), यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १३ | मत्स्य महाविद्यालय, रत्नागिरी, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १४ | मत्स्य महाविद्यालय, नागपुर, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपुर यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| १५ | राष्ट्रिय पर्यावरण अभियांत्रीकी संशोधन संस्था (NEERI) मुंबई, यांचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| १६ | टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्स (TISS ), मुंबई यांचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| १७ | महाराष्ट्र सागरी क्षेत्र नियमन प्राधिकरण (MCZMA) यांचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| १८ | महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, (MPCB) मुंबई, यांचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| १९ | जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट (JNPT) यांचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| २० | तेल आणि नैसर्गिक वायु महामंडळ (ONGC) याचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| २१ | मुंबई पोर्ट ट्रस्ट (MbPT) याचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| २२ | महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड (MMB) याचे प्रतिनिधी | निमंत्रीत |
| २३ | महाराष्ट्र राज्य मच्छिमार संघ (मच्छिमारांचे प्रतिनिधी) | निमंत्रीत |
| २४ | सह आयुक्त मत्स्यव्यवसाय, सागरी/भुजल/निमखारे, आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल.

१. मत्स्यव्यवसाय क्षेत्राशी निगडित (सागरी/भुजल/निमखारे) उद्ढभवलेल्या समस्यांवर उपायोजना सुचविणे

२. या संदर्भात आवश्यक असल्यास इतर राज्यांचा अभ्यास करुन त्यावर स्वयंस्पष्ट अभिप्राय/अहवाल पुनर्विलोकन समितीस सादर करणे.

मा.मंत्री, मत्स्यव्यवसाय, यांच्या अध्यक्षतेखाली पुनर्विलोकन समिती-

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, (मत्स्यव्यवसाय) | अध्यक्ष |
| २ | मा. राज्यमंत्री, (मत्स्यव्यवसाय) | उपाध्यक्ष |
| ३ | प्रधान सचिव, मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ | सदस्य |
| ५ | आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहिल.

१. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांच्या अध्यक्षतेखाली गठित तांत्रीक समितीमार्फत सादर केलेल्या अहवालावर योग्य तो निर्णय घेणे

२. समितीमार्फत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने संबधित विभागास कार्यवाही साठी आदेशित करणे

३. दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने संबधित विभागामार्फत करण्यात येणा-या कारवाई वर सनियंत्रण ठेवणे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२२०५१३१५२४५९६५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Shrinivas Jagannath Shastri

Digitally signed by Shrinivas Jagannath Shastri
DN: c=IN, o=Personal, title=2388, pseudonym=ca8d31b3edf9920fda8c1d0f5f135a08db96d9d51605 2454832375d63a281822, postalCode=410210, st=Maharashtra, serialNumber=c02f19ac7e7ab3a50d817c95cf483e33229cf0cbb03 283b175900630f81d2337, cn=Shrinivas Jagannath Shastri
Date: 2022.05.13 15:28:20 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. अपर मुख्य सचिव, महसुल व वने विभाग, मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रधान सचिव/ सचिव, (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. प्रधान सचिव/ सचिव, (पर्यावरण) , मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. प्रधान सचिव/ सचिव, (नगर विकास), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई

१०. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. सह आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग ,मुंबई
१३. महालेखपाल (लेखापरिक्षक/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१४. निवडनस्ती.